जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे या स्वयंसेवी संस्थेमार्फत शिवाजीनगर, पुणे (मुलांसाठी) व नाना पेठ पुणे (मुलींसाठी) येथे चालविण्यात येणाऱ्या निरीक्षणगृह/बालगृह यांची मान्यता रद्द करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बालगृ-२०१७/प्र.क्र. १४६ /का ८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० फेब्रुवारी, २०१९.

**वाचा :** १) मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र. १७६३/२०१८, जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे वि. महाराष्ट्र शासन मधील दि. २२.६.२०१८ राजीचे निर्देश.

**प्रस्तावना-:**

महिला व बाल विकास विभागांतर्गत बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ ची अंमलबजावणी करण्यात येते. सदर अधिनियमांतर्गतच्या “विधी संघर्षग्रस्त बालके” आणि “काळजी व संरक्षणाची गरज असलेली बालके” यांना निवासी व इतर अनुषंगिक सेवा पुरविण्याकरिता इच्छुक स्वयंसेवी संस्थांना बालगृह/निरीक्षणगृह चालविण्याकरिता शासन मान्यता देण्यात येते. त्यानुसार जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे या स्वयंसेवी संस्थेस शिवाजीनगर, पुणे येथे मुलांसाठी निरीक्षणगृह/बालगृह आणि नाना पेठ, पुणे येथे मुलींसाठी निरीक्षणगृह/ बालगृह चालविण्यास शासन मान्यता होती. तथापि, संबंधित स्वयंसेवी संस्थेच्या सभासद बैठकीतील मंजूर ठरावानुसार शिवाजीनगर, पुणे आणि नाना पेठ, पुणे येथील निरीक्षणगृह/बालगृह बंद करण्यात येऊन संस्थेत बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ अंतर्गत दाखल मुलांना इतरत्र स्थलांतरित करण्यासाठी शासनास आदेश देणेबाबत संस्थेने रिट याचिका क्र. १७६३/२०१८ दाखल केली होती. मा. उच्च न्यायालयाने संस्थेत दाखल मुलांना इतरत्र स्थलांतरित करण्यास राज्य शासनास सहा महिन्याची मुदत देऊन दि. २२.६.२०१८ च्या निर्देशान्वये याचिका निकाली काढली आहे. त्यानुसार संबंधित संस्थेत दाखल मुलांना/ मुलींना इतर संस्थेत दाखल करण्यात आले असल्याने जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे या स्वयंसेवी संस्थेच्या निरीक्षणगृह/बालगृह यांची मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. जिल्हा परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे या स्वयंसेवी संस्थेमार्फत चालविण्यात येणाऱ्या शिवाजीनगर, पुणे येथील दोन व नाना पेठ, पुणे येथील एक अशा तीन निरीक्षणगृह/बालगृह यांची बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ अंतर्गत देण्यात आलेली मान्यता सदर शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. संबंधित संस्थेस शासनाकडून देय अथवा वसूली करणे आवश्यक असलेल्या अनुदानाची निश्चिती मूल्यनिर्धारणाद्वारे करण्यासाठी आवश्यक कागदपत्रांची पडताळणी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी पुढील तीन आठवड्याच्या आत करावी. त्यानुसार संस्थेस अनुदान देय असल्यास त्यासाठी उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून प्राधान्याने खर्च करण्यात यावा.

३. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी संबंधित संस्थेकडून शासनाकडे जमा करणे आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे व प्रमाणपत्रे घ्यावीत.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१९०२२०१७१००६४७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray
Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.02.20 17:12:09 +05'30'

**( स्मिता निवतकर )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रत –**

१) मा.राज्यपाल, यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई .
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
४) मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद ,महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा /विधानपरिषद,महाराष्ट्र विधीमंडळ.
६) मा.मंत्री (म व बा वि)/ राज्यमंत्री(म व बा वि),यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई .
७) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
११) प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) प्रधान सचिव (ले व को),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१३) आयुक्त , महिला व बाल विकास आयुक्तालय,म.रा. पुणे.
१४) संचालक,स्थानिक निधी लेखा परीक्षा,कोकण भवन,नवी मुंबई
१५) मुख्याधिकारी चिल्ड्रेन्स एड् सोसायटी, माहिम, मुंबई
१६) महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
१७)महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
१८)संचालक,लेखा व कोषागरे संचालनालय,म.रा.मुंबई
१९)संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई
२०) सर्व उपसचिव ,सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास. नवीन प्रशासकीय भवन , मुंबई

२१) उपायुक्त (बालविकास) महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
२२) वित्त विभाग (व्यय-६/अर्थसंकल्प-७/कोषा-प्रशा-२), नियोजन विभाग (का-१४७२) मंत्रालय,मुंबई -३२,
२३) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
२४)सचिव, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
२५)सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
२६)निवड नस्ती का-८